अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेल्या तथापि महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेल्या शासन मान्य संस्थेतील अभ्यासक्रम (Non-AICTE) बंद करून अनामत रक्कम परत करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्र. मान्यता-२०१९/(प्र.क्र.१७५/१९)/तांशि-५,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२०

वाचा:-

१. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मरातंशिमं/का-५३/तपासणी/ २०१९-२०/६१८२, दिनांक ०८.०८.२०१९
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मरातंशिमं/का-५०/२०१९-२०/४२२, दिनांक १५.०१.२०२०
३. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मरातंशिमं/का-५०/२०२०/१६८४, दिनांक ०६.०३.२०२०

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारित नसलेल्या तथापि महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारित असलेल्या संस्थेतील अभ्यासक्रम बंद करून संस्थेने जमा केलेली अनामत रक्कम संस्थेच्या खाती वर्ग करण्याची विनंती महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांनी त्यांचे उपरोक्त पत्रान्वये केलेली आहे. सदर विनंतीस अनुसरून सदर संस्थेमार्फत चालविला जात असलेला अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेला (Non-AICTE) अभ्यासक्रम बंद करून संस्थेने जमा केलेली अनामत रक्कम संस्थेच्या खाती वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारित नसलेले, तथापि महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारित असलेले, खालील तक्त्यात नमूद संस्थेचे अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१९-२० पासून बंद करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहुन शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | अभ्यासक्रम | प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|
| १. | उमंग इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर (संस्था क्र.०८६३) | डिप्लोमा इन मेरीटाइम केटरींग ॲण्ड हॉटेल मॅनेजमेंट (HC) | ६० |
| | | डिप्लोमा इन ३-डी ॲनिमेशन ॲण्ड ग्राफिक्स (DA) | ६० |
| | | सर्टीफिकेट कोर्स इन इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी (IO) | ६० |
| | | डिप्लोमा इन ड्रेस डिझायनिंग व मॅन्युफॅक्चरींग (DM) | ६० |
| २. | उमंग कॉलेज ऑफ इंटेरिअर ॲण्ड फॅशन,नागपूर (संस्था क्र.१०१४) | ॲडव्हान्स डिप्लोमा इन फायर सेफ्टी इंजिनिअरींग (FS) | ४० |
| | | डिप्लोमा इन इंटेरिअर डिझाईन ॲण्ड डेकोरेशन (ID) | ४० |

१. या संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्र, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने मंडळाकडे सूपूर्द करणे आवश्यक राहील.

२. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३. संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४. संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थरावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५. संस्थेतील संबंधित अभ्यासक्रम बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशीत विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परीक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थांवर बंधनकारक राहील.

६. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

७. संबंधित संस्थेने उपरोक्त अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी शासनाकडे जमा केलेल्या नियत ठेवी बाबत मंडळाने खातरजमा करून सदर नियत ठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्याची पुढील कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१६१२१०४८५१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2020.03.16 12:16:53 +05'30'

**(अ. र. काटकर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, ४९, खेरवाडी,वांद्रे (पुर्व), मुंबई-४०००५१,

३. संबंधित संस्था (महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे मार्फत),

४. निवड नस्ती/तांशि-५.